नवनाथ भक्तिसार    अध्याय पंधरावा

मागील अध्यायात जालिंदरनाथ तीर्थाटन करीत हेलापट्टण नगरीत पोहोचले. स्वर्गवासी त्रिलोचन राजाची पत्नी आणि पराक्रमी राजा गोपीचंदची माता; महाराणी मैनावती ही आध्यात्मिक प्रवृत्तीची, भाक्तीमार्गातली साध्वी, पापभिरू होती. तिने कठोर परिश्रमाने व प्रांजळ भक्तीभावाने सद्गुरू जालिंदराचा कृपा प्रसाद आणि वरदान मिळवले. हेच भाग्य आपल्या पराक्रमी पुत्रास; राजा गोपीचंदास मिळावे म्हणून तिची इच्छा होती आणि त्यासाठी तिचे प्रामाणिकपणे प्रयत्न चालले होते पण गोपीचंदची पट्टराणी कुमावंतीने त्यांत अडथळे आणले त्याचे परिणाम म्हणजे क्रोधीत झालेल्या राजा गोपीचंदाने जालिंदराला जमिनीत गाडले, अर्थात लौकिक अर्थाने जालिंदरानाथ गाडले गेले होते पण त्याच्यावर साक्षात परमेश्वरी वरदान असल्यामुळे त्यांनी त्या खड्ड्यात वज्रासन घातले आणि ध्यानस्थ होऊन तपाचरण सुरु केले.

हिमालयावरील बद्रीकाश्रम परीसरात गोरक्ष आणि कानिफा यांचेही वेगवेगळया स्थानी उग्र तपाचरण सुरु होते. परंतु एकमेकांना त्याची गंधवार्ता नव्हती. भविष्यातील घडामोडींची कल्पना असल्यामुळे साक्षात श्री महादेवाने गुप्तता पाळली होती. बारा वर्षांचा काळ संपला. उद्यापन करून तपाची सांगता झाली. महादेवाने त्यांना निरोप दिला. श्री महादेवांनी त्यांची भेट कौशल्याने टाळली होती. कानिफनाथ उत्तर दिशेला आणि गोरक्षनाथ दक्षिणेकडे निघाले. दोघांनाही स्वतःच्या गुरुभेटीची उत्कंठा असल्यामुळे ते त्यांचा शोध घेत होते. प्रयाग, गया, काशी इत्यादी उत्तरेकडील तीर्थक्षेत्री कानिफ गुरु जालिंदरांना शोधत होते, तर गोरक्ष श्री मच्छिंदरांच्या भेटीसाठी दाक्षिण मध्ये हिंदुस्थानामध्ये भटकंती करीत होते.

श्रीगुरूभेटीसाठी व्याकुळ झालेल्या गोरक्षनाथांची अवस्था तर पाण्याबाहेर काढलेल्या माशाप्रमाणे तडफड करणारी होती. आईपासून ताटातुट झालेल्या बालकाप्रमाणे तो टाहो फोडीत होता. अन्नपाण्याची शुद्ध नाही. निद्रेचे ही भान नाही. भेट होत नाही म्हणून आलेली विमनस्कता त्यांच्या देहबोलीतून व्यक्त होत होती. क्षणोक्षणी प्राणाची तडफड, भूतासारखा अवतार झाला होता. श्री गुरुचे तेजस्वी रूप, गुण, पराक्रम, आठवून शोक व्यक्त होत होता. “श्रीगुरुदेव! गुरु महाराज!! गुरुनाथ कुठे आहात तुम्ही? हे वृक्षवेलींनो, हे पशुपक्षांनो, हे मानवांनो!! माझे गुरुदेव तुम्ही पाहिलेत का? कुणाला दिसेल का? मला सांगा, मला त्यांची भेट घडवा. गुरुमहाराज दर्शन द्या!” अशा केविलवाणेपणाने त्याचा सारखा आक्रोश सुरु होता. डोळयांतच प्राण उरले होते. गावागावातील ग्रामस्थांना, मार्गातील वाटसरूंना, तीर्थक्षेत्रांवरील भाविकांना हाच प्रश्न विचारीत, शोध घेत गोरक्षनाथ गौड देशातील हेलापट्टण येथे आला. प्रदीर्घ काळाच्या तपश्चर्येमुळे शरीर दुबळे झाले होते. त्यांत गुरूच्या वियोगामुळे मानसिक तणाव आणि वाटचालीच्या श्रमाने, थकल्यामुळे गोरक्षनाथ नगरच्या प्रवेशद्वारावर खालीच बसला. देहाचा नुसता सापळा झाला होता. नेत्रातून आश्रू वाहत होते. तेथील द्वारपालांना विचारले, सज्जन हो! येथे मच्छिंद्रनाथ नावाचे कोणी तपस्वी साधू आले होते का?

द्वारपाल म्हणाले, “नाही बाबा! मच्छिंद्रनाथ नाही परंतु जालिंदर नावाचा एक तपस्वी आला होता. काय त्याच्या चमत्काराचे वर्णन करावे! त्याच्या डोईवरील गवताचा भारा हातभर वर असा अधांतरी तरंगत असे. आम्ही प्रत्यक्ष हे दृश्य पाहिले आहे.”

ते गवताचा भारा कशासाठी आणत होते?”

“कशासाठी म्हणजे काय? गाईंना खाण्यासाठी चारा”

त्यांनी गाई पाळल्या होत्या का?

नाही हो! गावातल्याच गाई. केवळ दया भावनेने, निस्पृह वृत्तीने ते गाईंना चारा घालीत."

किती दिवस ते इथे राहिले?, नंतर कुठे गेले? आणि नाहीसे होऊन किती काळ झाला असावा" अशी प्रश्नांची सरबत्ती गोराक्षनाथांनी सुरु ठेवली होती. त्याला उत्तर देताना द्वारपाल म्हणाले, "अंदाजे एक वर्षभर होते. नंतर मात्र ते कुठे गेले, कधी गेले, हे काही सांगता येत नाही. कारण त्यांना जाताना कुणी पाहिले नाही. अचानक जणू अदृश्य झाले. जवळपास दहा वर्षे तरी झाली आहेत.

गोरक्षनाथ मनात वर्षांचा हिशोब करीत विचार करू लागले, "नक्कीच नावात बद्दल करून गावोगावी वावरणारे आपले श्रीगुरूच असावेत. मी तपश्चर्या अर्धवट सोडून त्यांना भेटावयास येईन की काय अशा शंकेने त्यांनी नावात बदल केला असावा." अशा विचारांनी ते दुःखी झाले आणि हुंदके देऊ लागले आणि नंतर तर दुःखावेग असहाय झाल्यावर हंबरडा फोडला, "गुरु SS माउली! मला पाडसाला रानात सोडून का गेलात? आता मी तुम्हाला कुठे शोधू? ह्या अज्ञान बालकाला का हुलकावणी दिलीत? तुम्हीच माझे मातापिता आहात आता मला तुमच्याशिवाय कोण आहे? मी कुणाच्या आश्रयाला जाऊ?" त्यांचा आक्रोश ऐकून तो कनवाळू द्वारपाल धीर देण्यासाठी म्हणाला, "साधु महाराज कशासाठी विलाप करता? परमेश्वरावर श्रद्धा ठेवा, तो तुम्हा गुरुशिष्यांची भेट जरूर घडवेल. जावा! नगरीत जाऊन भिक्षा मागा आणि घासभर अन्न पोटात घाला."

"अल्लख निरंजन!" अशी गर्जना करून गोरक्षनाथांनी नगरीत प्रवेश केला. गोरक्षनाथ भिक्षा मागत फिरत होते. योगायोगाने जालिंदरनाथ ज्या ठिकाणी भूमीत गाडले गेले होते, तेथील एका घरी भिक्षेसाठी गोरक्षनाथांनी, "अल्लख निरंजन!" असा खड्या आवाजात पुकारा करताच, भूमीतून, "आदेश!" असा प्रतिसाद आला. तो धीरगंभीर ध्वनी ऐकताच गोरक्षनाथ थरारून म्हणाले, "महाराज आपण कुठे आहात?"

"मी धरणीच्या उदरात आहे!"

महाराज! आपण कोणते नाव धारण केले?"

मी, अग्नीपुत्र जालिंदर आहे पण आपण कुठे आहात आणि आपले श्रीगुरू कोण आहेत?"

मी मच्छिंद्र शिष्य गोरक्ष आहे. तथापि महाराज, आपण असे भूमीच्या उदरात कसे? जगातील मानवजातीचे पापाचरण वाढले असून आपणच जर असे केले तर त्यांना सन्मार्गावर कोण आणणार?" त्यावर जालिंदरनाथांनी घडलेली घटना सविस्तरपणे कथन केली. ते ऐकून गोरक्षनाथांचा संताप झाला, ते म्हणाले, "महाराज! मला आज्ञा करावी क्षणात त्या राजाला भस्म करतो. आपणांसारखी वंदनीय गुरुमूर्ती त्याने भूमीत गाडली आहे, हा कसला राजा? तो आता कसे राज्य करतो ते पहातोच. आपण आज्ञा द्यावी. तात्काळ त्याला पालथा घालून धुळीस मिळवतो." गोराक्षाचा राग शांत करण्यासाठी जालिंदर म्हणाले, "गोरक्षनाथ आपण समजता तसे काहीच झाले नाही. क्रोध आवरा! या घटनेमुळे भविष्यकाळाच्या उदरातून काही चांगले उपजणार असून त्यामुळे नाथपंथाचा प्रचार आणि प्रसार होणार आहे म्हणून हे सहन केले पाहीजे. सबब क्रोधाच्या आहारी जाऊ नका आणि या घटनेबाबत गुप्तता राखा. परंतु आपल्या भ्रमंतीत जर माझा शिष्य कानिफ भेटला तर फक्त त्यालाच ही गोष्ट सांगा, म्हणजे तो येथे येऊन युक्तीप्रयुक्तीने मला वर काढून,

राजा गोपीचंदाचेही कल्याण करील आणि नाथपंथाची ही भरभराट करील. तरी आता आपण निरोप घ्यावा. शुभंभवतु. आदेश."

गोरक्षनाथ शांत झाले. भक्तिभावाने जालिंदर नाथांना वंदन केले. नगरीत क्षुधातृप्ती होईल. इतकी भिक्षा मागून आहार केला आणि भ्रमंती करीत जगन्नाथपुरीस आले.

उत्तर हिंदुस्थानामध्ये कानिफनाथ स्वतःच्या गुरूचा शोध घेत होता. प्रवास मार्गातील गावागावांत गावकऱ्यांना रसाळ भाषेत ज्ञानोपदेश करून नाथपंथाचा प्रचार करीत असत. त्यांच्या प्रभावी बोधामृताने लोक भक्तीसागरात बुडून जात. कानिफनाथ तपस्वी होते, सामर्थ्यशाली होतेच पण अवतारी विभूती असल्याने त्यांचा अनुग्रह घेण्यासाठी लोकांची गर्दी अमर्याद असायची. हजारो लोकांनी त्यांचे शिष्यत्व स्वीकारले. काही विरक्त मनाचे अनुयायी तर घरदार, प्रापंचिक बंधने तोडून योगीराज कानिफनाथां सोबत भ्रमंती करीत निघाले. कित्येक गावातून एक दोन करता करता नाथांसोबत सातशे शिष्यांचा मेळा जमला. शिष्यपरिवारासह पंथाचा प्रचार आणि प्रसार करीत कानिफनाथ पूर्व दिशेकडे मजल दरमजल करीत चालले होते.

"अल्लख निरंजन!" 'आदेश!' अशा गर्जना करीत कैक शिष्य समुदयासह स्त्री राज्यच्या सीमेजवळ पोहोचला. स्त्री राज्यात पुरुष नाही; कोणी पुरुष तिथे गेल्यास मृत्य होतो, हे सर्वश्रुत होते. स्त्री राज्याची सीमे नजीक आल्याचे ऐकून शिष्यमंडळात खळबळ उडाली. त्यांचे चित्त स्थिर आणि दोलायमान झाले होते. दबक्या आवाजात कुजबुज सुरु झाली, ती अशी... "स्त्री राज्यात नर जन्मत नाही, किंवा बाहेरून कुणी गेल्यास त्याचा मृत्यु अटळ! तेथे सर्व स्त्रियांच आहेत हे विख्यात असताना आपले गुरुदेव तिथेच निघाले आहेत हे वास्तव माहित असून सुद्धा ते स्वतः सह शिष्यमंडळींची अग्नीकुंडात आहुती देणार असे दिसते. आता काय प्रसंग उद्भवणार?"

"आपल्या म्हण्यात निश्चितच तथ्य आहे. विष प्राशन केल्याने किंवा अग्नीप्रवेश केल्याने मृत्यु येणार हे सांगावयास जाणकार भविष्यवेत्याची गरज नाही. पेटलेल्या निखाऱ्याच्या ढिगाऱ्यांत घुसल्यावर कोण वाचेल?"

"अहो! पण हे गुरूंना कसे कळत नाही? दीप ज्योतीला कवेत घेण्यासाठी उतावीळ झालेला पतंग जसा जळून भस्म होतो, तशी आपली राख रांगोळी होणार बघा! स्त्री राज्यच्या सीमेवर आपला घास घेण्यासाठी काळ जबडा वासून सज्ज आहेच."

"सोळा आणे सत्य बोललात! या गुरूच्या नादाने नाहक मारण्यापेक्षा आपण उलट पावली परत फिरावे. अहो! जीव बचावला तरच साधना करता येईल. मेल्यावर साधना शक्य आहे काय?"

"खरे आहे तुमचे. आपण गुपचूपपणे माघारी पळून गेलो, तरच जीव वाचणार आहे."

"काय राव, खुळ्यासारखे बोलत आहात गुरूंवर विश्वास ठेवा. त्यांचे पाय धरून शरण जावे. ते काय आपणाला मरू देणार आहेत का? आणि जीवाचे काय घेऊन बसलात? आज नाही तर उद्या मृत्यु हा आहेच. हे तर त्रिकालबाधित सत्य आहे. आपण तन, मन, धन, वाचा आणि आपले जीवित्व गुरुंचरणी शपथपूर्वक अर्पण केले आहे, त्याची तरी आठवण ठेवा. केवळ प्राणभयाने, वचनभंग, शपथभंग अशी पापे करणे प्रशस्त नाही.

“अहो ‘भंग’ वाले तुम्हाला आणि त्या गुरूंना वेड लागले आहे. तिकडे मुडदा पडल्यावर व्रताचे कोड कौतुक काय कामाचे? सूज्ञ विचार करा आणि पळा, जिव वाचवू या.”

“होय! तुम्हाला नसेल परत फिरायचे तर नका येऊ कारण ज्याचे आयुष्य भरले आहे, त्याला रोखले तरी तो स्वतः होऊन मृत्यु जवळ जातोच. तुमचे ही तसेच झाले असावे. प्राणांची पर्वा नसेल तर अवश्य जाणे.”

अशा प्रकारची कुजबुज कर्णोपकर्णी होत अर्थात नाथांच्या कानापर्यंत पोहोचली, ते मनात म्हणाले, “सगळे अपरिपक्व, दुर्बल आणि दुबळे आहेत. गुरूंवर विश्वास नाही. जिव प्यारा आहे. आपला पराक्रम सांगून समजविण्याचा प्रयत्न केला.. तरीही विशास ठेवणार नाहीत, असो!” नाथांनी स्पर्शास्त्र प्रयोगाने भस्म मंत्र जपून सिद्ध केले आणि तिन्ही दिशांना फेकले. फक्त समोरच्या स्त्री राज्याकडे जाण्याचा मार्ग मोकळा ठेवला. उर्वरित दिशा स्पर्शास्त्राने बंदिस्त केल्या कारण शिष्यवृंदाने परत पळून जाऊ नये, तसेच मारुतीने हल्ला करू नये, अशा हेतूने अस्त्र पेरणी केली. नंतर सर्व शिष्यांची एक सभा घेऊन कानिफनाथ म्हणाले, “शिष्य गणहो! येथून पुढे स्त्री राज्याच्या सीमेला सुरवात झाली आहे, तेथील तीर्थ स्थानाचे दर्शन घेण्याची आमची इच्छा आहे. तथापि स्त्री राज्यात नर जीव वाचत नाही. हे आपणा सर्वांना माहित आहे परंतु माझा श्रीगुरूंवर नितांत विश्वास आहे. त्या विश्वास बळावर आम्ही वाचून परत येऊ; हे नक्की! आणि समजा नाही वाचलो, तरी मृत्यूसुद्धा सुखाचा मानु परंतु स्त्री राज्यात जाण्याचा आमचा निश्चय अढळ आहे. यावर आपला विचार काय आहे तो स्पष्ट करावा. जे निःसीम गुरुभक्त आहेत. त्यांनी आमच्या समवेत यावे. ज्यांचा विश्वास डळमळीत असेल, गुरूंवर पूर्ण भरवसा नसेल, प्राणाचे भय वाटत असेल, त्यांना येण्याचा आग्रह नाही. त्यांना येथूनच परत जाण्याची अनुमती आहे. तरी प्रत्येकाने आपला निर्णय ठरवावा.

श्रीगुरुजींचे आव्हान ऐकून शिष्यवृंद आनंदित झाला. गुरूंना साथ देण्यासाठी आणि गुरुसोबत मरण्यासाठी सातशे शिष्यांपैकी फक्त सात शिष्य तयार झाले आणि गुरुनी मोठ्या मनाने परत जाण्यासाठी परवानगी दिलेले शिष्य; प्राण भयाने तातडीने परतीच्या मार्गाला लागले. एकमेकांना दिलासा देण्यासाठी म्हणत होते, “बरे झाले! आपण वाचलो, आपल्या मानासारखे घडले आहे. गुरूंनी स्वतः परवानगी दिल्यामुळे आपण वचनभंगाच्या पातकातून मुक्त झालो. आपल्या नावांस गुरुद्रोही म्हणून बट्टा लागला नाही, ह्याचा आनंद होत आहे.” अशाप्रकारे चर्चा करीत परतण्यासाठी त्वरेने पावले उचलीत होते. कानिफनाथ केवळ सात शिष्यांसह निर्धाराने स्त्री राज्याकडे निघाले. पळपुटे शिष्य कोसभर दूर गेले असतील नसतील आणि चमत्कार झाला. नाथांनी पेरून ठेवलेल्या स्पर्शास्त्राच्या प्रभावाने पाय जमिनीस घट्ट चिकटले. पाय निघेनात म्हणून हाताने काढावयास गेले तर हात ही चिकटून बसले. चतुष्पाद प्राण्यासारखी ओणवी अवस्था झाली.

स्त्रीराज्याची सीमा ओलांडण्यापूर्वी कानिफनाथ त्या सात साथ गुरु भक्तांना म्हणाले; “येथून सुमारे कोसभर अंतरावर माघारी निघालेले पळपुटे भूमीला हातपाय चीकटल्याने ओणवे उभे आहेत. तुम्ही जाऊन त्या प्रत्येकाच्या पाठीवर एक एक मोठा दगड ठेवून परत या. ही विभूती तुमच्या कपाळावर लावलेली असावी. जा! त्यांच्या समाचार घेऊन या!” असे म्हणून नाथांनी भस्म झोलीतील विभूती त्यांच्या भाळावर लाऊन पाठविले.

गुरूंची आज्ञा प्रमाण म्हणून ते सप्त गुरुभक्त त्यांच्या जवळ जाऊन पाहतात, तर काय? ते गाढवासारखे ओणवे झाले आहेत. ह्या सात जणांना पाहून ते अतिशय शरमिंदे झाले. सप्त गुरुभक्त म्हणाले, “काय हो! मध्येच थांबलात. पहा,

ईश्वराची लीला अगाध आहे; सर्वजण चिकटून बसलात ना? अरे गाढवांनो! गुरूंशी प्रतारणा करून कुणी भवसागर पार केला आहे का?" नंतर प्रत्येकांच्या पाठीवर एक एक वजनी दगड ठेवताच तो पाठीला चिकटला, अंग हलविले तरी तो पडेना. प्रखर उन्हात ओणवे झालेले, पाठीवर दगडाचे ओझे घेऊन घायकुतीला आले. सर्वांगातून वेदना जाणवू लागल्या. व्याकूळ होऊन रडत भेकत म्हणाले; "आम्ही चुकलो; आम्हाला क्षमा करा. ह्या संकटातून सोडवा!"

सप्त शिष्य उत्तारले; "तुम्हाला सोडविणे आमच्या हातात नाही. श्रीगुरूच तुम्हाला सोडवू शकतील. आता स्त्री राज्यातून परतल्यावरच ते तुम्हाला सोडवतील तोपर्यंत धीर धरा. संकट येताच पळ काढता? तुम्हाला जीव प्रिय आहे ना, मग गुरु करता काशाला? आता गुरूंशी प्रतीक्षा करा." ते सप्त शिष्य निघतांना जमिनीला चिकटलेले शिष्य दीनवाणीपणे आक्रोश करू लागले. "माउली पेक्षा गुरु अधिक दयाळू असतो; म्हणून त्यांना गुरुमाऊली म्हणतात. आम्ही अज्ञानी, चुकलो आहोत; तरी दया करून सुटका करवी. आम्ही सुद्धा स्त्रीराज्यात येऊ. आमचा भ्रम दूर झाला असून गुरूंची शक्ती आम्हाला समजली आहे. आता आमचा गुरूंवर विश्वास बसला आहे. शरणागताला मरण देऊ नका." सप्त शिष्य म्हणाले; "ठीक आहे! आम्ही गुरूंची विनवणी करून तुमची सुटका करू. गुरुमाउलींच्या द्याळूपणांवर आमचा विश्वास आहे."

हे सात शिष्य नाथांजवळ आले आणि हात जोडून म्हणाले; "गुरुमाऊली! त्यांची फारच दैन्यावस्था झाली आहे. दया करा. त्यांच्या वतीने आम्ही क्षमायाचना करीत आहोत. त्यांचा भ्रम दूर झाला आहे. पाठीवर दगडाचे ओझे घेऊन ते सर्व रडत आहेत. यापुढे गुरुचरण सोडून जाणार नाही. तुमच्या बरोबर स्त्री राज्यात येऊ. आता द्विधा मनःस्थिती होणार नाही. तरी महाराज; त्यांच्यावर कृपा करा. सोडवा त्यांना!!" असे म्हणतात. सप्त शिष्यांची रदबदली ऐकून दयाळू नाथांनी विभक्तासत्राने भस्म मंत्रून एका शिष्याजवळ दिले आणि सांगितले; "त्वरेने तेथे जावे, आणि त्या प्रत्येकाच्या कपाळाला हे भस्म लावावे. त्वरित ते मुक्त होतील."

त्याप्रमाणे कपाळी भस्म लावताच चिकटलेले शिष्य मुक्त झाले, त्यांचा आक्रोश थांबला. हे सगळे शिष्य धावत येऊन श्रीगुरूंच्या पायाशी लोटांगण घालू लागले, हात जोडून स्तुती करीत म्हणाले; "गुरुमाऊली आमच्यावर दया केलीत; फार उपकार झाले. आता आपल्या चरणांपासून आम्ही कधीच दूर जाणार नाही. गुरुदेव कानिफनाथानंचा जयजयकार असो!" नाथांनी सर्वांना क्षमा केली.

सातशे शिष्यांच्या लवाजम्यासह कानिफनाथ स्त्री राज्याच्या सिमेवर पोहोचले. सूर्यास्त झाल्याने तिथेच तळ ठोकून वस्ती केली. नेहमीप्रमाणे भूभूःकार करण्यासाठी श्री हनुमंत रामेश्वराहून स्त्री राज्यात चालला होता. सीमेनजीक येताच स्पर्शास्त्राने त्यांचे पाय भूमीला चिकटले पण केवळ शक्तीच्या जोरावर महाबली हनुमंत स्पर्शास्त्र न जुमानता पावले टाकू लागले. वज्रशारिरी हनुमंत विचारात पडले. "हे निश्चित स्पर्शास्त्र आहे. ह्याचा अर्थ कोणीतरी प्रतापी ह्या भागात आला असावा." ह्या शंकेने शोध घेत सीमेवर पाहतो तर, शेकडो नाथपंथी संन्याशी तळ ठोकून आहेत. महाबली चिंतामग्न झाले. "मी मोठ्या चातुर्याने मच्छिंद्रनाथांना स्त्रीराज्यात रावना केले आहे. हे सर्व नाथपंथी तिथे गेल्यास ते मच्छिंदरांना उपदेश करून परत घेऊन जातील. मैनाकिनी राणी दुःखी होईल. आता त्यांना पुढे जाऊन न देता येथूनच पिटाळले तर पुढील अनर्थ टळेल." असा विचार करून मारुतीरायाने अतिप्रचंड महाकायेचे भीमरूप धारण करून भूभूःकार केला. जमिनीवर फाडफाड शेपूट आपटून भयावह आवाज करू लागले. ते दृश्य पाहून सर्व शिष्य भयभीत

होऊन थरथर कापत श्रीगुरूंच्या मागे लपले. “महाराज! प्रलयकाळ आला आहे. आता हा आम्हा सर्वांचा घास घेईल. आमचे रक्षण करा. काहीतरी उपाय योजा. आपणच आमचे तारक आहात!”

कानिफनाथ म्हणाले, “घाबरू नका. धीर धरून फक्त पाहत राहा. मी असे पर्यंत तुमचे कोणी काही करू शकत नाही. शांतपणे चमत्काराची पाहणी करा. नाथांनी वज्रास्त्र मंत्रून भस्म फेकताच वज्रास्त्र प्रकट झाल्याचे हनुमंताने पहिले. महाबली ने त्याच्यावर मोठे मोठे पर्वत भिरकावले परंतु वज्रास्त्राने त्या पर्वताचे चूर्ण केले. ते पाहून महाबलीने बेभान होऊन, वज्रास्त्रावर भयंकर ताकदीने एकच मुष्टी प्रहार केला आणि वज्रास्त्र मोडून टाकले. मुष्टीघाताचा आणि वज्रभंगाचा प्रचंड मोठा ध्वनी आसमंतात दणाणून गेला. त्यामुळे अधिक क्रोधीत होऊन नाथांनी त्वरित कालिकास्त्र आणि त्या पाठोपाठ अग्नयअस्त्र, वासवास्त्र, वायुस्त्र सोडून जोरदार हल्ला चढविला. चारही अस्त्रे एकदम महाबलीशी झुंजू लागली. अग्नयअस्त्रच्या प्रभावामुळे भयंकर अग्नीज्वालांनी हनुमंत वेढला गेला वायुस्त्राने अग्नीला सहाय्य करून भयंकर उष्णता निर्माण केली. समोरून कालिकास्त्र आणि पिछाडीवरून वासावस्त्र प्रहार करू लागले. एकाच वेळी चार अस्त्रांशी झुंजतांना रामदूत हनुमंत बेजार झाला. एका हाताने कालिकास्त्र आणि दुसऱ्या हाताने वासवास्त्राला पकडण्याचा प्रयत्न करू लागले. परंतु ती दोन्ही अस्त्रे अतिचपळ आणि बलवान होती. हातात सापडत नव्हती, मग वायुस्त्राची स्तुती करीत म्हणाली, “हे तातश्री वायुदेवा! मी आपला पुत्र वायुनंदन; मारुती, तुम्हाला शरण आलो आहे. माझ्याशी युद्ध करून आपल्या कुळाचा नाश करू नका. कुळरक्षण हे पितृ कर्तव्य असते. कुळरक्षणासाठी तरी माझ्यावर दया करा.” या विनंतीमुळे वायुस्त्र शांत झाले. अग्नयअस्त्राचा ताप असहाय्य झाल्याने मारुतीने अग्नीला शेपटाने पकडून गुंडाळले. कानिफनाथांनी ते पाहताच मोहनास्त्र टाकले. त्यामुळे हनुमंताचे चित्त विचलित झाले. मती गुंग झाली. मोहनास्त्राने गुप्तपणे त्याच्या हृदयात शिरण्याचा प्रयत्न केला परंतु वज्रदेहामुळे ते शक्य झाले नाही. तरी सुद्धा मोहनास्त्राने आपला प्रभाव दाखविलाच. चित्त विचलित झालेल्या शेपटीने गुंडाळलेले अग्नयस्त्र समुद्रात भिरकावून दिले. त्यामुळे सागरातले पाणी इतके तप्त झाले की उकळू लागले. जलचर सृष्टीला धोका निर्माण झाला. सागर स्वतः प्रकट झाला. पहातोय तर मारुती आणि कानिफाचे रणकंदन सुरु आहे. ह्या दोघांच्या संग्रामाचा त्याला नाहक त्रास झाला होता. त्यामुळे सागराने स्वतःच पर्जन्यास प्रयोगाने पाऊस पाडून सागरजल थंड करून सागर सृष्टीचे रक्षण केले. त्यातच मोहनास्त्राचा अंमलात असलेल्या मारुतीने शेपटीचा वेध टाकून एक मोठा पर्वत उचलण्याचा प्रयत्न करू लागला. त्यात लक्ष गुंतले असल्याची संधी साधून समोरून कालीकास्त्राने आणि पाठीमागून वासवास्त्राने एकाच वेळी हनुमंतावर धडक मारून प्रहार केला. दोन मेढ्यांनी एकमेकांना टक्कर मारावी, तशी दोन्ही अस्त्रांची मारुतीवर धडक बसताच मारुती बेशुद्ध झाला, आणि धरणीवर कोसळला. आपल्या मुलाला अशा अवस्थेत पाहिल्यावर वायू प्रत्येक्ष्यात प्रकटला आणि मुला जवळ गेला पण मारुतीने स्वतःला सावरले आणि शेपटीने भूमीवर प्रहार करीत त्वेषेने कानिफनाथावर झेपावला त्यावेळी वायूदेवाने त्याचा हात धरून म्हटले; “पुत्रा! मारुती, शांत हो. माझे ऐक; हे नाथपंथी योगी फार पराक्रमी असल्याने त्यांच्याशी युद्ध करू नको. मच्छिंद्रनाथाने तुला जसे डोक्यावर पर्वत असतांनाही जखडून टाकले होते, हा कानिफ सुद्धा तसाच पराक्रमी आहे त्याच्या जवळ वाताकर्षण ही हुकमी विद्या असून ती इतरांना अवगत नाही त्यांच्याशी सख्य करण्यातच हित आहे. सख्य करून कार्यसिद्धी करणे हेच उद्दिष्ट असावे. गुळाने मरत असेल तर विष कशाला?” त्याचवेळी दुरून रणसंग्राम पाहत असलेला सागर सुद्धा त्यांच्या जवळ येऊन म्हणाला, “होय! वायुनंदना, माझे ही हेच सांगणे आहे. समेट करून सख्य करण्याशिवाय तरणोपाय नाही.”

वायुदेव आणि सागर हे हनुमंताला घेऊन कानिफनाथांकडे आले, प्रेमादराने एकमेकांना आलींघन दिले. नाथांनी तिन्ही देवांना वंदन केले. हात जोडून हनुमंताला विचारले, “महाबली वायूनंदना! युद्धभूमी का सोडली?”

वायूदेवाने सूत्रे स्वतःकडे घेत विचारले, “कर्णकानिफा! कसले युद्ध? तुम्ही दोघांनी हा संघर्ष कशाकरिता आरंभला आहे. ह्या झुंजण्यामागे काय हेतू आहे त्याची फलनिष्पत्ती काय? ते तरी कळू द्या.”

अंजनीपुत्र म्हणाला, “मी अतिशय चातुर्याने आणि प्रयत्नपूर्वक मच्छिंद्रनाथांना स्त्रीराज्यात नेऊन ठेवला आहे. हे जोगी सुद्धा त्याच पंथातले आहेत. हे स्त्री राज्यात जाऊन त्याला भेटीतील आणि बोध करून परत घेऊन जातील; ह्या शंकेने त्यांना रोखण्यासाठी मी युद्धासाठी सरसावलो. असो, यांनी स्त्री देशात जाण्यास माझी काही हरकत नाही परंतु मच्छिंद्रला परत घेऊन जाण्याचा प्रयत्न करू नये. त्याला माझा विरोध राहील. तसा प्रयत्न करणार नाही असे ह्यांनी वचन दिल्यास, मी त्रास देणार नाही,”

यावर सागर म्हणाला; “कर्णकानिफा! वायुसुताचा या भाष्यावर तुला काही सांगावयाचे आहे काय?” कानिफनाथ मारुतीरायाकडे पाहुन स्मित करीत म्हणाले; “हे तुमच्याच मनातील विचार आहेत. मच्छिंद्राला बोध करण्याचे किंवा घेऊन जाण्याचे आम्हाला कारण नाही. स्त्रीराज्यात तीर्थ स्थानाचे दर्शन करणे हेच आमचे प्रयोजन आहे. मच्छिंद्रा विषयी प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष कोणतेही कृत्य करणार नाही, हे आमचे वचन आहे.”

अशा प्रकारे कलहाचा मुद्दाच निकालात निघाला. गैरसमजातून उद्भवलेला संघर्ष मिटला. तिन्ही देव प्रसन्न होऊन स्वस्थानी गेले. श्रीगुरुदेवांचा पराक्रम पाहून शिष्य मंडळी कृतार्थ झाली.

सूर्योदयाच्या प्रथम किरणांबरोबर कानिफनाथने शिष्य परिवारसह स्त्रीराज्यात प्रवेश करून तीर्थक्षेत्र भ्रमंतीस सुरुवात केली. शृंगमुरड ह्या राजधानीच्या नगरीत आले. महाराणी मैनाकिनी आणि महाराज मच्छिंद्रनाथांनी त्यांची माहिती काढण्यासाठी दूत रवाना केले. द्वाररक्षकांकरावी माहिती समजली की, त्यांच्या भेटीसाठी सातशे शिष्यांसह कानिफनाथ आले आहेत. महाराज मच्छिंद्रनाथांनी विचारले, “कोणत्या पंथाचे आहेत ते संन्यासी?”

“कानकाटे नाथपंथीय असल्याचे सांगत होते.”

हे ऐकून महाराज दचकले. त्यांना वाटले की नावात बदल करून नक्कीच गोरक्ष आला असावा आता तो मला जबरदस्तीने घेऊन जाईल. मी येथे चांगला सुखात होतो. रूपसुंदरी मैनावती राणीच्या प्रेमात विहरत होतो. आता हा कसला राहू देतोय! हा मला घेऊन जाणार. दुधात मिठाचा खडा पडावा तसा सगळा नाश झाला. असो! आपल्या प्रारब्धाचे भोग म्हणायचे! अशा निराशाजनक विचारात, घोड्यावर स्वार होऊन स्वागतासाठी महाद्वाराजवळ मच्छिंद्रनाथ आले.

तेथे कर्ण कानिफाला पाहून त्यांच्या मनातली अस्थिरता गेली. हा गोरक्ष नाही म्हणून ते सुखावले. स्वागत महालात भरजरी जाजमे अंथरली होती, त्यावर उभय नाथ स्थानापन्न झाले. महाराज मच्छिंद्रनाथांनी विचारले; “महाराज! आपण कोण, आपले गुरु कोण? साद्यात परिचय द्यावा मग कानिफनाथांनी जालिंदरनाथच्या जन्मापासूनचा सर्व इतिहास कथन केला. तेव्हा महाराज प्रसन्न होऊन म्हणाले; “कानिफा! ऐकून मला खूप आनंद झाला आहे. तू ज्यांचा उल्लेख

केला आहेस ते जालिंदरनाथ माझे गुरुबंधू असून तू माझा पुत्र आहेस. काय बोलू आणि किती बोलू तुझ्याबरोबर असे झाले आहे.

सजविलेल्या हत्तीच्या अंबारीत बसवून मिरवणूक काढून कानिफनाथांना राजवाड्यात आण्यात आले. एक महिनाभर सर्वांना राजेशाही थाटात ठेवून त्यांचा पाहुणचार केला. शाही अतिथ्याने त्यांना सन्मानित करण्यात आले.

फलश्रुती: ह्या अध्याच्या पठणाने घरातील व बाहेरील भांडणतंटा मिटून शांतता लाभेल.